**शैक्षणिक वर्ष २०२४-२५:**
**अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांमध्ये नवीन अभ्यासक्रम/विषय/विशेषस्तर विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखांना मान्यता देणेबाबत.**
**(न्यायालयीन प्रकरणे)**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक: न्यायाप्र- २०२३/(१३०/२३)/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ११ मार्च, २०२४ .

संदर्भ:
१. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. एनजीसी-२०१७/(२०८/१७)/मशि-४, दि. १३.०९.२०१७
२. याचिका क्र. ६६७९/२०२३ प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, औरंगाबाद यांचे दिनांक २०.०६.२०२३ रोजीचे आदेश.
३. याचिका क्र. ७३१८/२०२३ प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, औरंगाबाद यांचे दिनांक ०३.०७.२०२३ रोजीचे आदेश.
४. याचिका क्र. ६२५१/२०२३ प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, औरंगाबाद यांचे दिनांक ०५.०७.२०२३ रोजीचे आदेश.
५. याचिका क्र. ६२८४/२०२३ प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, औरंगाबाद यांचे दिनांक १५.०६.२०२३ रोजीचे आदेश.
६. याचिका क्र. ८२४३/२०२३ प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, मुंबई यांचे दिनांक ०१.०८.२०२३ रोजीचे आदेश.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (४) मधील तरतूदीनुसार स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड व शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर यांनी शिफारशीत केलेल्या नवीन अभ्यासक्रम/विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा यांच्या प्रस्तावास मान्यता न मिळाल्याने अर्जदार संस्थांनी मा. उच्च न्यायालयात याचिका दाखल केल्या होत्या. सदर याचिकांप्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयास अनुसरून शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयातील नवीन अभ्यासक्रम/विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा यांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (४) मधील तरतूदी आणि संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड व शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर या विद्यापीठांनी शैक्षणिक वर्ष २०२३-२४ मध्ये नवीन अभ्यासक्रम/विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा सुरु करण्यासंदर्भात प्रस्ताव शासन मान्यतेसाठी शिफारशीत केले आहेत.

२. विद्यापीठांकडून प्राप्त प्रस्तावांची संदर्भाधीन शासन निर्णयानुसार नवीन अभ्यासक्रम/विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा यांना मान्यता देण्यासंदर्भात विहित करण्यात आलेल्या निकषांनुसार तपासणी करण्यात आली आहे. त्यानुसार निकषांची पुर्तता करणाऱ्या प्रस्तावांना महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (४) (घ) अन्वये व त्या खालील परंतुकानुसार शासनास असलेल्या

अधिकारांचा वापर करुन सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद केलेल्या एकूण १२ महाविद्यालयातील नवीन अभ्यासक्रम/विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा शैक्षणिक वर्ष सन २०२४-२५ पासून कायम विना अनुदान तत्वावर सुरू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त नवीन अभ्यासक्रम/विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखांकरीता पुढील प्रमाणे अटी व शर्ती लागू राहतील.

१. विवरणपत्रातील महाविद्यालयांना नवीन अभ्यासक्रम/ विषय/ विशेषस्तर विषय अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा याबाबतची मंजूरी कायम विनाअनुदान तत्वावरील असल्याने सदर मान्यतेच्या अनुषंगाने अशा महाविद्यालयांना अनुदान तत्त्वावर शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची मागणी करता येणार नाही.

२. विवरणपत्रातील ज्या महाविद्यालयांना नवीन अभ्यासक्रम/ विषय/ विशेषस्तर विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयांनी त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत, असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

३. महाविद्यालयाने हमीपत्र सादर केल्याशिवाय किंवा तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

४. महाविद्यालयांनी, संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. ३ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

५. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

६. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करू नये.

७. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील १०८ (१) नुसार संलग्निकरणाची कार्यवाही करावी.

४. विद्यापीठांनी संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी शासन मान्यता आदेशांचे अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे अट क्रमांक ३ मधील प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

५. मंजूर करण्यात आलेल्या नवीन अभ्यासक्रम / विषय/ विशेषस्तर विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखांच्या अनुषंगाने संबंधित विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी नियतकालिक आढावा घेऊन सदर नवीन अभ्यासक्रम / विषय/ विशेषस्तर विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखांमध्ये मंजुर प्रवेश क्षमतेच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी प्रवेशित असल्यास सदर नवीन अभ्यासक्रम / विषय/ विशेषस्तर विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखांची मान्यता रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या मान्यतेने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता, या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१११३१६१३१९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.03.11 13:25:23 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (उ. व तं. शि.), मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
८. कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.
९. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड, कोल्हापूर.
१०. संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत)
११. निवडनस्ती (मशि-४)

**शासन निर्णय क्रमांक:न्यायाप्र-२०२३/प्र.क्र.१३०-मशि-४, दिनांक ११. ०३.२०२४ सोबतचे विवरणपत्र**

| अ.क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नाव | अभ्यासक्रम/विषय, अतिरिक्त तुकडी, नवीन विद्याशाखा |
|---|---|---|
| | **स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड** | |
| १. | रहेमानिया तालीमी सोसायटी, निलंगा, जि. लातूर<br>देशमुख कला, वाणिज्य व विज्ञान वरिष्ठ महाविद्यालय, कासार सिरसी, ता. निलंगा, जि. लातूर | १)बी.ए. - अभ्यासक्रमांतर्गत ऐच्छिक विषय - उर्दु, इतिहास<br>२)बी.एस्सी- अभ्यासक्रमांतर्गत मायक्रोबायोलॉजी, ॲनॅलिटीकल केमिस्ट्री विषय |
| २. | अनुसया शिक्षण प्रसारक मंडळ गोजेगाव, ता. मुखेड, जि. नांदेड<br>स्वामी विवेकानंद महाविद्यालय, मुक्रमाबाद, ता. मुखेड, जि. नांदेड - ४३१ ७१९. | १)बी.कॉम. |
| ३. | नांदेड एज्युकेशन सोसायटी, नांदेड<br>पीपल्स कॉलेज, नांदेड | १)एम. ए. लोकप्रशासन<br>२)एम. ए. - इतिहास |
| ४. | नूतन विद्यामंदिर शिक्षण संस्था, परभणी<br>कै.सौ.कमलताई जामकर महिला महाविद्यालय, जिंतूर रोड, परभणी | १)एम. ए. इतिहास<br>२)एम. ए. गृहविज्ञान |
| ५. | महाराष्ट्र शिक्षण समिती निलंगा, ता. निलंगा, जि. लातूर<br>महाराष्ट्र महाविद्यालय, निलंगा, ता. निलंगा, जि. लातूर | १)एम.एस्सी. -ऑर्गनिक केमिस्ट्री<br>२)एम.एस्सी. - वनस्पतीशास्त्र |
| ६. | रॉयल एज्युकेशन सोसायटी, त्रिमुर्ती नगर, लातूर<br>संगणकशास्त्र व माहितीतंत्रज्ञान महाविद्यालय (कॉक्सिट), लातूर | १)बी.एस्सी. - सॉफ्टवेअर डेव्हलपमेंट<br>२)बी.एस्सी. - डेटा सायन्स<br>३)एम.एस्सी. -कॉम्प्युटर ॲप्लिकेशन<br>४)एम.एस्सी. - डेटा सायन्स |
| ७. | दयानंद शिक्षण संस्था, बार्शी रोड, लातूर<br>दयानंद विज्ञान महाविद्यालय, लातूर | १)बी.एस्सी. - सी.एस. (तुकडी) |
| ८. | महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी उदगीर,ता उदगीर, जि. लातूर<br>महाराष्ट्र उदयगिरी महाविद्यालय, उदगीर, ता. उदगीर, जि. लातूर | १)एम.कॉम. |
| ९. | कै. दिंगबरराव बिंदू स्मारक समिती, भोकर, जि. नांदेड<br>दिगंबरराव बिंदू कला, वाणिज्स व विज्ञान | १)एम. एस्सी. गणित (Mathematics) |

| | | |
|---|---|---|
| | महाविद्यालय, भोकर, जि. नांदेड | |
| १०. | श्री. गजानन शिक्षण प्रसारक मंडळ, येलदरी कॅम्प, ता. जिंतूर, जि. परभणी<br>तोष्णीवाल कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, सेनगांव, ता. सेनगांव, जि. हिंगोली | १)एम.एस्सी. - सुक्ष्मजीवशास्त्र<br>२)एम.एस्सी. - रसायनशास्त्र |
| ११. | जयक्रांती शिक्षण प्रसारक मंडळ, लातूर<br>स्वामी विवेकानंद महाविद्यालय, एमआयडीसी, लातूर | १)बी.सी.एस.<br>(बी.एस्सी. -सी.एस.) |
| | **शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर** | |
| १२. | ज्ञानगंगा शिक्षण प्रसारक मंडळ, माळवाडी-कोतोली, ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर.<br>श्रीपतराव चौगुले आर्टस ॲन्ड सायन्स कॉलेज, माळवाडी-कोतोली, ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर | १)एम.एस्सी. भाग १ - ऑरगॅनिक केमिस्ट्री (२०)<br>२)एम.एस्सी. भाग १ - जनरल मायक्रोबायोलॉजी (२०) |